2010080517482300।

विकास योजना - धुळे

मौजे देवपूर येथील सर्व्हे क्र. ४६/१ब/३-२ मधील ३.११ हेक्टर पैकी २.५१ हेक्टर क्षेत्र कृषी विभागातून वगळून सार्वजनिक निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करणेबाबत, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३७(१ कक) अन्वये सूचना

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२**
**शासन निर्णय क्र.टिपीएस-१११०/अनौ.१४१/प्र.क्र.२२०/१०/नवि-९,**
**दिनांक: २८ जुलै, २०१०.**

**शासन निर्णय** :- सोबतची सूचना (मराठी/इंग्रजी) महाराष्ट्र शासनाचे राजपत्रात कृपया प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(प्रदीप गोहिल)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, धुळे.
४) आयुक्त, धुळे महानगरपालिका, धुळे.
(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत सूचनेचे वर्तमानपत्रातील जाहिरातीचे देयक कृपया आपल्या कार्यालयाकडून अदा करण्यात यावे. )
५) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उपसंचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
७) नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे.
८) सहायक संचालक, माहिती आणि जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबत जोडलेली सूचना जाहिरात म्हणून कृपया प्रसिध्द करण्यात यावी. जाहिरात कोणत्या दिनांकास प्रसिध्द करण्यात आली आहे त्याबाबतची माहिती शासनास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे आणि उपसंचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांना पाठवावी. प्रसिध्दी बाबतच्या सूचना पूढीलप्रमाणे आहेत.)

| | | | |
|---|---|---|---|
| १. | जाहीरात देणा-या कार्यालयाचे नांव | -- | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २. | जाहीरात कोणत्या तारखेपर्यन्त दयावयाची | -- | तात्काळ |
| ३. | प्रसिध्दीचे स्वरुप | -- | स्थानिक |
| ४. | कोणत्या जिल्हयात | -- | धुळे |

37(1AA)

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | किती वृत्तपत्रात | -- | दोन वृत्तपत्रात (१ मराठी व १ इंग्रजी) |
| ६. | वृत्तपत्राचा वर्ग | -- | 'ब' वर्ग |
| ७. | कितीवेळा | -- | एकदा |
| ८. | जाहिरात खर्चाचे बिल कोणत्या अधिका-याकडे पाठवावयाचे त्या कार्यालयाचे नांव व संपुर्ण पत्ता | -- | आयुक्त, धुळे महानगरपालिका, धुळे. |

९) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, येरवडा कारागृह, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय सूचना महाराष्ट्र शासनाचे असाधारण राजपत्रात नाशिक विभागीय पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करण्यात येऊन त्यांच्या प्रत्येकी ०५ प्रती या विभागास, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे व उपसंचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांना पाठविण्यात याव्यात.)

१०) कक्ष अधिकारी (कार्यासन नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची सूचना विभागाच्या वेब साईटवर ठेवावी.)

११) निवडनस्ती (कार्यासन, नवि-९)

*****************

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२**
**दिनांक: २७ जुलै, २०१०.**

## <u>सूचना</u>

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६*

**क्र. टिपीएस-१११०/अनौ.१४१/प्र.क्र.२२०/१०/नवि-९:-** ज्याअर्थी, धुळे शहराची सुधारित विकास योजना (यापुढे ज्यास "उक्त विकास योजना" असे संबोधिले आहे) शासनाने, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे ज्यास "उक्त अधिनियम" असे संबोधले आहे) च्या कलम ३१(१) अन्वये शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र. टिपीएस-१०८४/५७१/प्र.क्र.४८४/८४/२/नवि-१७, दिनांक १७ ऑक्टोबर, १९८६ नुसार मंजूर केली असून ती दिनांक १ जानेवारी, १९८७ पासून अंमलात आली आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत मौजे देवपूर येथील सर्व्हे क्र. ४६/१ब/३-२ मधील ३.११ हेक्टर क्षेत्रापैकी २.५१ हेक्टर कृषी विभागात समाविष्ट आहे (यापुढे ज्यास "उक्त क्षेत्र" असे संबोधले आहे) ;

आणि ज्याअर्थी, उक्त क्षेत्र (भारत सरकारच्या मनुष्यबळ विकास मंत्रालयाच्या अखत्यारीतील स्वायत्त संस्था) केंद्रीय विद्यालय संघटन (भारत सरकारच्या मनुष्यबळ विकास मंत्रालयाच्या अखत्यारीतील स्वायत्त संस्था) यांना केंद्रीय विद्यालय, धुळे करिता वाटप झालेले असून प्राचार्य, केंद्रीय विद्यालय, धुळे यांनी दिनांक १८ मार्च, २०१० रोजीच्या पत्रान्वये उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळण्याची राज्य शासनास विनंती केली आहे ;

आणि ज्याअर्थी, सार्वजनिक हिताच्या दृष्टीने, उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळून, अशाप्रकारे मुक्त झालेले क्षेत्र सार्वजनिक निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करणेबाबत (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिले आहे) उक्त अधिनियमाच्या कलम ३७(१ कक) अन्वये कार्यवाही करण्याचा राज्य शासनाने निर्णय घेतला आहे ;

आता, त्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम ३७(१ कक) अन्वये प्रदत्त असलेल्या अधिकारानुसार शासन याद्वारे उक्त फेरबदल प्रस्तावासंदर्भात जनतेकडून सूचना / हरकती मागविण्यासाठी प्रस्तुतची सूचना प्रसिध्द करीत आहे. प्रस्तावित फेरबदलासंदर्भात काही सूचना / हरकती असल्यास त्या त्यांनी ही सूचना प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नविन प्रशासकीय इमारत, विभागीय आयुक्त, कार्यालय आवार नाशिक रोड, नाशिक यांचेकडे लेखी स्वरुपात पाठवाव्यात. उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांची प्राप्त होणा-या हरकती / सूचनांवर सुनावणी देण्याकरिता उक्त अधिनियमातील कलम १६२(१) अन्वये अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात

37(1AA)

येत असून त्यांनी त्यांचा अहवाल शासनास उपरोक्त मुदत संपल्यानंतर ३० दिवसांत सादर करावा. फक्त विहीत मुदतीत प्राप्त होणाऱ्या हरकती / सुचनांचाच शासन विचार करेल.

**<u>टिप</u> :- (क)** उपरोक्त प्रस्तावित फेरबदल दर्शविणाऱ्या विकास योजना भाग नकाशाची प्रत जनतेच्या अवलोकनार्थ खालील कार्यालयात, कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत उपलब्ध राहील.

१) उप संचालक नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.

२) आयुक्त, धुळे महानगरपालिका, धुळे.

३) नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे.

**(ख)** सदर सूचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.**

**( प्रदीप गोहिल )**
**कार्यासन अधिकारी**

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated - 27th July, 2010**

**NOTICE**

*The Maharashtra Regional and Town Planning Act, 1966.*

**No. TPS-1110/U.O.R.-141/CR-220/10/UD-9**: Whereas Revised Development Plan of Dhule City (hereinafter referred to as "the said Development Plan") have been sanctioned by Government under section 31(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act No. XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") vide Urban Development Department's Notification No. TPS-1084/571/CR-484/84/2/UD-17, dated 17th October, 1986 to come into force with effect from 1st January, 1987 ;

And whereas, in the said Development Plan the land bearing Survey No. 46/1B/3-2 (Pt) admeasuring 2.51 Ha. (hereinafter referred to as "the said Land") out of total area 3.11 Ha. is included in Agricultural Zone ;

And whereas, the said Land has been allotted to Kendriya Vidyalaya Sanghatan (A autonomous body under Ministry of HRD, Govt. of India) for Kendriy Vidyalaya, Dhule. And the Principal, Kendriya Vidyalaya, Dhule has requested the State Government to delete the said Land from Agricultural Zone ;

And whereas, in the public interest at large, the Government has decided to initiate the procedure under section 37 (1AA) of the said Act to delete the said Land from Agricultural Zone and to include the land so released in Public - Semi Public Zone (hereinafter referred to as "the said Modification Proposal") ;

Now therefore in accordance with the provisions contained in section 37(1AA) of the said Act, Government, hereby publish this notice for inviting suggestions and objections on the said Modification Proposal from the public with reasons thereof within 30 (thirty) days from the date of publication of the notice in Maharashtra Government Gazette. The suggestions and objections shall be addressed to the Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik, Commissioner office compound, New Administrative building, Nashik Road, Nashik who is hereby appointed as an officer and authorised to hear the suggestions and objections which may be received within the aforesaid stipulated period and submit his report to Government. The suggestions and objections received within the aforesaid stipulated period will only be considered by Government.

**Note:- A)** A plan showing the abovesaid proposed modification to the said Regulations is kept open for inspection by the general public in the offices of the following officers :-

1) The Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik.
2) The Commissioner, Dhule Municipal Corporation, Dhule.
3) The Town Planner, Dhule Branch, Dhule.

**B)** This Notice is also available on Govt. web site **www.urban.maharashtra.gov.in**

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**(Pradeep Gohil)**
**Desk Officer**